मौजे कळवाडी ता. मालेगाव,जि.नाशिक या नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु- २०१३/प्र.क्र. १३६/पापु ०९
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मुंबई-४०० ०३२
तारीख: ४ जुलै, २०१७

वाचा -

१) ग्रामपंचायत कळवाडी, ता. मालेगाव,जि. नाशिक यांचा ग्रामसभा ठराव क्र १८ दि. २६.८.२००७
२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नाशिक मूळ तांत्रिक मान्यता आदेश क्र जिपना/ग्रापापुवि/भानिक/तांशा/५/१२००/०८ दि. १२.६.२००८
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,नाशिक यांचे पत्र क्र जिपना/ ग्रापापुवि/ तांशा/ २६१६/२०१६ दि. १.१२.२०१६
४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नाशिक सुधारीत तांत्रिक मान्यता आदेश क्र जिपना/ग्रापापुवि/रेशा१/तांमं/२८०८/२०१६ दि. ३१.१२.२०१६

प्रस्तावना

मौजे कळवाडी ता.मालेगाव जि.नाशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु. ७४,३२,३४७/- (ढोबळ)** किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.१ अन्वये प्रशासकीय मान्यता व संदर्भ क्र २ अन्वये तांत्रिक मान्यता प्रदान केली होती. तथापि, उदभवता झालेला बदल, दरसूचीतील वाढ व इतर कारणांमुळे योजनेच्या खर्चात रु. ४५,६४,०७४/- इतकी वाढ झाली आहे. त्यामुळे कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, ग्रापापुवि, नाशिक यांच्या संदर्भ क्र.४ येथील आदेशान्वये प्रस्तुत योजनेच्या **रु. १,१९,९६,४२१ /-(ढोबळ)** किंमतीच्या प्रस्तावास सुधारीत तांत्रिक मान्यता देण्यात आली आहे. परिणामी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक, यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्र.३ अन्वये शासनास सादर केला होता. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

वरील बाब विचारात घेता मौजे कळवाडी ता.मालेगाव जि.नाशिक या सुधारीत नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. १,१९,९६,४२१ /- (ढोबळ) (अक्षरी रुपये एक कोटी एकोणीस लक्ष शहान्नव हजार चारशे एकवीस फक्त) एवढ्या सुधारीत किंमतीस प्रशासकीय मान्यता देणेबाबत नियोजन व वित्त विभागास प्रस्ताविण्यात आले होते. तथापि, वित्त विभागाने योजनेच्या दरसूचीतील बदलामुळे

वाढीव रक्कमेवर आकारलेले ई.टी.पी. चार्जेस रु. १,२४,३८६/- व नवीन पंपीग मशिनरीची प्रस्तावित रक्कम रु. १,६६,७७८/- वगळून रु. १,१७,०५,२५७/- इतक्या किंमतीस मंजूरी प्रदान केली आहे. त्यानुसार कळवाडी, ता. मालेगाव. जि. नाशिक पाणी पुरवठा योजनेच्या **रु.१,१७,०५,२५७/- (रु. एक कोटी सतरा लक्ष पाच हजार दोनशे सत्तावन्न फक्त )** इतक्या किंमतीस पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी**

१. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

२. उपरोक्त नमुद सुधारीत किंमतीत योजनेची उर्वरित सर्व कामे जिल्हा परिषद स्तरावरून ६ महिन्यात पूर्ण करावीत.

३. सदर योजना पूर्ण झाल्यावर चाचणी घेतल्यानंतर ती संबंधित ग्रामपंचायतीस हस्तांतरीत करून तिचे लेखे बंद करण्यात यावेत.

४. सदर योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायतीची/जिल्हा परिषदेची राहील.

६. हागणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

८. या योजनेवर होणारा खर्च राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

२. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्य अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र.१९/१४४३ दि. २.२.२०१७ व १२९/व्यय- ३ दि. ५.४.२०१७ अन्वये प्राप्त त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०४१६१३३६०८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vaishali Dattatraya Fulsundar

Digitally signed by Vaishali Dattatraya Fulsundar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=00e21046f4f20f3438928047553b9a3968c8ec5276af888 3c74ff066482ba683, serialNumber=035ad3ac42b3cb2d7153eb07ca4987f4c28aa8b52 bad8a330512fc5df5d5b426, cn=Vaishali Dattatraya Fulsundar
Date: 2017.07.04 16:13:16 +05'30'

**( वै.द.फुलसुंदर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
३) सर्व मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य
४) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५) विभागीय आयुक्त, नाशिक
६) जिल्हाधिकारी, नाशिक
७) संचालक, भुजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पी.एम.टी बिल्डींग स्वारगेट, पुणे
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक
९) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
१०) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
११) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
१२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नाशिक.
१३) कक्ष अधिकारी (कार्या १४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) कक्ष अधिकारी (व्यय-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) कार्यासने (पापु-०४, १० व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
१६) निवडनस्ती कार्यासन पापु-०९.